




जनहिताय सर्वद

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक**
**मंत्रालय, मुंबई-४०००३२.**

दूरध्वनी क्र.०२२-२२०४८२४७ Email ID :dokh.rfd@maharashtra.gov.in

---

**क्रमांक: गौखनि-२९/१०२३/प्र.क्र.५५/ख-१** **दिनांक:- ११ मार्च, २०२४**

**विषय:- गौण खनिज- रत्नागिरी**

सन २०२२-२३ करीता रत्नागिरी जिल्ह्यातील वाशिष्ठी नदी/दाभोळ खाडीमधील यांत्रिकी/ड्रेजरद्वारे उत्खननास राखीव ठेवण्यात आलेल्या नकाशा क्र.१९६०, गांग्रई ते करंबवणे, गट CC, उपगट CC-१ या वाळू गटामधून उत्खनन करता न आलेल्या वाळूचा परतावा मिळणेबाबत
मे.चिपळूण सॅन्ड मायनिंग ॲन्ड ट्रेडिंग कार्पोरेशन तर्फे श्री.निसार अ.कादीर कटमाले

**शासन ज्ञापन :-**

सन २०२२-२३ करीता रत्नागिरी जिल्ह्यातील वाशिष्ठी नदी/दाभोळ खाडीमधील यांत्रिकी/ड्रेजरद्वारे उत्खननास राखीव ठेवण्यात आलेल्या नकाशा क्र.१९६०, गांग्रई ते करंबवणे, गट CC, उपगट CC-१ हा वाळूगट २२,०८४ ब्रास वाळू परिमाणाकरीता मे.चिपळूण सॅन्ड मायनिंग ॲन्ड ट्रेडिंग कार्पोरेशन तर्फे श्री.निसार अ.कादीर कटमाले यांनी दिनांक १९/०४/२०२२ च्या लिलावात रु.२,६५,००,०००/- इतकी सर्वोच्च बोली नमूद केली. जिल्हाधिकारी कार्यालयाच्या दि.१७/०५/२०२२ रोजीच्या पत्राच्या अनुंगाने लिलावधारक यांनी दि.१७/०५/२०२२ रोजी लिलावाच्या रक्कमा शासन जमा केल्या आहेत.

०२. जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांनी दिनांक २२/०९/२०२२ च्या आदेशान्वये उक्त वाळू गट २२०८४ ब्रास परिमाणाकरीता दिनांक २८/०२/२०२३ पर्यतच्या कालावधी करीता मंजूर केला.सदर गटाचा ताबा दिनांक ३०/०९/२०२२ रोजी तहसीलदार, चिपळूण यांचे मार्फत देण्यात आला. प्रकरणी न्यायालयीन दावे व तांत्रिक कारणास्तव उक्त वाळूगटातून मंजूर वाळूसाठ्याचे उत्खनन न झाल्याने मुदतवाढ देण्याबाबत लिलावधारक यांनी केलेली विनंती अपर जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांनी दिनांक ०६/०२/२०२३ रोजीच्या आदेशान्वये फेटाळली.

०३. अपर जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांच्या दिनांक ०६/०२/२०२३ रोजीच्या आदेशान्वये आदेशान्वये व्यथित होऊन लिलावधारक यांनी दाखल केलेल्या अपील अर्जावर मा. मंत्री (महसूल) यांनी दिनांक ०४/०९/२०२३ रोजी अर्जदार यांना न्यायालयीन विवाद व तांत्रिक कारणास्तव मंजूर वाळू स्थळातून उर्वरीत परिमाणाचे उत्खनन करणे शक्य झाले नसल्याने वाळू निर्गत धोरणातील तरतुदीनुसार उर्वरीत परिमाणापोटी परताव्याची रक्कम परिगणित करुन अदा करण्याचे आदेश दिले आहेत.

०४. मा. मंत्री (महसूल) यांनी दिनांक ०४/०९/२०२३ रोजी पारीत केलेले आदेश व त्या आदेशाच्या अनुषंगाने अपर जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांनी त्यांच्या दिनांक ११.१०.२०२३ च्या पत्रान्वये सादर केलेला अहवाल व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र सागरी मंडळ, मुंबई यांनी दि.२६.०५.२०२२ व दि.२७.०५.२०२२ रोजी केलेला पूर्व जल सर्वेक्षण अहवाल तसेच, दि. २६/०५/२०२३ रोजी केलेला पोस्ट

ड्रेजिंग सर्व्हे अहवालानुसार सन २०२२-२३ करीता नकाशा क्र.१९६०, गांग्रई ते करंबवणे, गट CC, उपगट CC-१ या वाळू गटातून उत्खनन करता न आलेल्या वाळूच्या परिमाणापोटी रक्कम रु.१,४४,१६,३१९/- (एक कोटी चव्वेचाळीस लाख सोळा हजार तीनशे एकोणावीस फक्त) एवढ्या रक्कमेचा परतावा अदा करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

**०५.** सबब, लिलावधारक मे.चिपळूण सॅन्ड मायनिंग ॲन्ड ट्रेडिंग कार्पोरेशन तर्फे श्री.निसार अ.कादीर कटमाले यांनी लिलावाची संपुर्ण रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापुर्वी ही रक्कम अदा केलेली नाही, याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर उत्खनन करता न आलेल्या वाळूची प्रमाणशिर रक्कम रु.१,४४,१६,३१९/- (एक कोटी चव्वेचाळीस लाख सोळा हजार तीनशे एकोणावीस फक्त) इतकी अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

**०६.** या बाबीवर होणारा खर्च सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता "०८५३-अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग" १०२- खनिजाबाबत सवलत फी व स्वामित्वधन, ९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग-वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६) खाली वजा परतावे या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या अंदाजपत्रकीय तरतूदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

**०७.** सदर शासन ज्ञापन, वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३८१/२०२३/व्यय-९ दि.२०.११.२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२४०३१११४२२००६३१९ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SHIVAJI SONAJI CHOURE

Digitally signed by SHIVAJI SONAJI CHOURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT,
2.5.4.20=fa37c7e079f23b78a27c84b9d6e46f94d549fc79ba170d58
15f3619617b13313, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=03FE2B2D715BED4B0D90A99525AE06946672E68E
A905C97DA50B34FD21223011, cn=SHIVAJI SONAJI CHOURE
Date: 2024.03.11 14:32:10 +05'30'

**( शिवाजी चौरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

**जिल्हाधिकारी, रत्नागिरी**

**प्रत:-**

१) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०००२०.
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)- १, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०००२०.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी
५) वित्त विभाग (व्यय-९/अर्थसंकल्प-३/६/१४ कार्यासने) मंत्रालय, मुंबई-४०००३२
६) कार्यासन अधिकारी (कार्यासन ब-१),
७) निवडनस्ती